२०१००२२६१९५१३८००१

सन २००९-१० या आर्थिक वर्षातील अर्थसंकल्पीय अनुदाने- ११ पंचायत राज प्रशिक्षण केंद्रांना अनुदान वाटप ( डिसेंबर,२००९ ते मार्च, २०१० )( तिसरा हप्ता)

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास व जलसंधारण विभाग**
शासन निर्णय क्रमांक :-अनुपं-२००९/प्र.क्र.४७/योजना-४
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,दिनांक:- २५ फेब्रुवारी, २०१०.

संदर्भ :- १.शासन निर्णय ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक प्रशिक्षण-२०९३/ प्र.क्र. ८४५/०९, दिनांक १७.०९.१९९३
२. शासन परिपत्रक ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक प्रशिक्षण १८९९/ प्र.क्र.५८१/६१, दिनांक २३ सप्टेंबर १९९८
३. शासन परिपत्रक ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक प्रशिक्षण २०००/ प्र.क्र.८५९/४४, दि.१२ जून,२००१.
४. शासन निर्णय क्रमांक :-अनुपं-२००९/प्र.क्र.४७/योजना-४,दिनांक २४.४.२००९.
५. शासन निर्णय क्रमांक :-अनुपं-२००९/प्र.क्र.४७/योजना-४,दिनांक २८.८.२००९.

## शासन निर्णय :-

सन २००९-२०१० या आर्थिक वर्षाकरीता, मागणी क्रमांक एल-२, "२०५३ - जिल्हा प्रशासन, (०६) (०१) पंच, सरपंच, सचिव, अशासकीय सदस्य इत्यादींना प्रशिक्षण - राज्य क्षेत्र (२०५३ ०५७ ४ ) " या लेखाशीर्षाखाली, ११ पंचायत राज प्रशिक्षण केंद्रांना वेतन व वेतनेतर बाबींवरील खर्च भागविण्यासाठी अनुक्रमे रुपये १,२३,९४,०००/- व रुपये २९,७४,०००/- अशी एकूण रुपये १,५३,६८,०००/- इतकी तरतूद अर्थसंकल्पित करण्यात आली आहे. वेतनेतर खर्चामध्ये प्रवास खर्च, कार्यालयीन खर्च, पाहुणे व्याख्याता मानधन, भोजन भत्त्यावरील खर्च व आकस्मिक खर्च इत्यादी बाबींचा समावेश आहे.

२. वरील अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या एकूण तरतूदीमधून एप्रिल ते जुलै,२००९ या चार महिन्यांच्या कालावधीतील वेतन व वेतनेतर बाबींवरील खर्च भागविण्यासाठी संबंधित पंचायतराज प्रशिक्षण केंद्रांना एकूण रुपये ५१,१६,०००/- एवढे अनुदान संदर्भाधीन दिनांक २४.४.२००९ च्या शासन निर्णयान्वये व विहित अटी व शर्तीच्या अधीन राहून वितरीत करण्यात आले आहे. तसेच ऑगस्ट ते नोव्हेंबर, २००९ या चार महिन्यांच्या कालावधीसाठी रुपये ६८,६८,०००/- एवढे अनुदान संदर्भाधीन दिनांक २८.८.२००९ च्या शासन निर्णयान्वये व विहित अटी व शर्तीच्या अधीन राहून वितरीत करण्यात आले आहे.

३. आता डिसेंबर, २००९ ते मार्च, २०१० या कालावधीतील वेतन व वेतनेतर बाबींवरील खर्च भागविण्यासाठी या शासन निर्णयासोबत जोडलेल्या विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे एकूण रुपये ३३,७८,०००/- एवढी तरतूद तिस-या हप्त्याच्या स्वरुपात वितरीत करण्यात येत आहे. सदर तरतूद संबंधित विभागीय आयुक्त यांच्या अधीनस्त ठेवण्यात येत असून सदरचा खर्च करण्यास संबंधित पंचायतराज प्रशिक्षण केंद्रांचे प्राचार्य यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

४. प्रशिक्षण केंद्रांना अनुदान द्यावयाच्या कार्यपध्दतीबाबत शासन परिपत्रक क्र. प्रशिक्षण- ११९८/ प्र.क्र.५८१/६१ दि.२३ सप्टेंबर, १९९८ व शासन परिपत्रक क्र. प्रशिक्षण २०००/प्र.क्र.८५९/४४, दि. १२ जून २००१ अन्वये निर्गमित करण्यात आलेल्या सूचनांच्या अनुंषगाने, सर्व संबंधित उप आयुक्त(आस्था), विकास शाखा, विभागीय आयुक्त कार्यालये यांनी प्रशिक्षण केंद्रास दरमहा अनुदान अदा करण्याची कार्यवाही कालमर्यादेत करावी. तसेच संदर्भ क्रमांक १ येथे दर्शविलेल्या शासन निर्णयातील परिच्छेद क्रमांक १२ मधील अटीनुसार केंद्रांनी खर्च करावा.

५. विभागीय आयुक्त कार्यालयाने अनुदान वितरीत करताना वेतन व वेतनेतर बाबींवर प्रत्यक्ष किती अनुदानाची आवश्यकता आहे ही बाब विचारात घेऊन त्यांच्या कार्यालयाचे आदेश निर्गमित करावेत. तसेच आपल्या अधीनस्थ पंचायतराज प्रशिक्षण केंद्रांकडून करण्यात आलेल्या खर्चाची व उद्दिष्टपूर्तीबाबतची माहिती शासनास दरमहा सादर करावी.

६. प्रशिक्षण केंद्रांनी या संदर्भात केलेल्या खर्चाची मासिक विवरणपत्रे सर्व संबंधित विभागीय आयुक्त यांना पुढील महिन्याच्या १० तारखेपर्यन्त सादर करावीत व अशा सादर केलेल्या मासिक खर्चाची तपासणी विभागीय आयुक्त यांनी करावी. खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र सर्व प्रशिक्षण केंद्रांनी विभागीय आयुक्त यांना सादर करावे. तसेच प्रशिक्षण कार्यक्रमाचे उद्दिष्ट, प्रशिक्षणार्थींचे उद्दिष्ट व साध्य या बाबतचा अहवाल अतिरिक्त महासंचालक, राज्य ग्रामीण विकास संस्था, पुणे यांना न चुकता पाठवावा व त्याची प्रत शासनास पाठवावी.

७. हा खर्च मागणी क्र.एल-२, "२०५३, जिल्हा प्रशासन,(०६) (०१) पंच, सरपंच, सचिव, अशासकीय सदस्य इत्यादींना प्रशिक्षण- राज्यक्षेत्र -( २०५३ ०५७ ४ ), ३१, सहाय्यक अनुदान, ३५ सहाय्यक अनुदान ( वेतन ) " या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यांत यावा व सन २००९-१० या वर्षी केलेल्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून भागविण्यांत यावा. तसेच, सदर खर्च त्याच संकेतांकाखाली खर्ची पडतो आहे याची दक्षता घेऊन व खर्चाचा ताळमेळ घालून सर्व संबधित विभागीय आयुक्त यांनी याबाबत खातरजमा करावी व तसे शासनास कळवावे.

८. या अनुदानातून संबंधित प्रशिक्षण केंद्राने केलेल्या खर्चाचे स्वंतत्र लेखे व पुस्तके तपासण्याचा अधिकार यथास्थिती महालेखापाल (लेखा), महाराष्ट्र-१, मुंबई आणि/किंवा महालेखापाल (लेखा), महाराष्ट्र-२, नागपूर यांना राहील व हे काम योग्य त-हेने पार पाडता यावे म्हणून संबंधित प्रशिक्षण केंद्रे संपूर्ण मदत/सुविधा पुरवतील.

९. हा शासन निर्णय वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८ भाग- पहिला, उपविभाग- एक अंतर्गत असलेल्या मुंबई वित्तीय नियम, १९५९ मधील तरतूदीनूसार व शासन निर्णय वित्त विभाग क्र.विअप्र १०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दि. १५-५-२००९ सोबतच्या परिशिष्टातील अनु.क्र.२७, नियम क्र.१४९ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( संजय गांगुर्डे )
कार्यासन अधिकारी

प्रत,
विभागीय आयुक्त,कोकण विभाग,नवी मुंबई ,पुणे,औरंगाबाद,नाशिक,अमरावती व नागपूर (प्रत्येकी २ प्रती)
उप आयुक्त (आस्था) विकास शाखा,विभागीय आयुक्त कार्यालय, कोकण विभाग, नवी मुंबई, पुणे, औरंगाबाद, नाशिक, अमरावती व नागपूर.
जिल्हा कोषागार अधिकारी,कोकण विभाग,नवी मुंबई, पुणे, औरंगाबाद,नाशिक ,अमरावती व नागपूर
महालेखापाल, (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता),महाराष्ट्र -१,मुंबई.
महालेखापाल, (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता),महाराष्ट्र-२,नागपूर .
महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी,बाणेर रोड,पुणे .
वित्त विभाग ,कार्यासन क्र. अर्थ-५/अर्थ-१७/व्यय-१५ .
प्राचार्य, पंचायत राज प्रशिक्षण केंद्र (सर्व).
कार्यासन क्र.वित्त-१,वित्त-६, वित्त-७ ग्राम विकास व जलसंधारण विभाग (२ जादा प्रतींसह)
निवड नस्ती का.क्र. योजना-४

शासन निर्णय क्रमांक :-अनुपं-२००९/प्र.क्र.४७/योजना-४, दिनांक:- २५ फेब्रुवारी, २०१० चे सहपत्र.

| अ.क्र. | पंचायतराज प्रशिक्षण केंद्रांचे नांव | तिस-या हप्त्याचे वितरण ( रुपये हजारात ) | |
|---|---|---|---|
| | | वेतन | वेतनेतर |
| १ | कोसबाड हिल, ठाणे | २४७ | ५९ |
| २ | वर्ये, सातारा | २४७ | ५९ |
| ३ | खिरोदा, जळगांव | २४८ | ६० |
| ४ | गारगोटी, कोल्हापूर | २४८ | ५९ |
| ५ | गौडगाव, सोलापूर | २४७ | ५९ |
| ६ | मुरुड, लातूर | २४८ | ६० |
| ७ | खामगांव, बुलढाणा | २४८ | ६० |
| ८ | शिवाजीनगर, अमरावती | २४८ | ५९ |
| ९ | हनुमाननगर, नागपूर | २४८ | ६० |
| १० | मूल, चंद्रपूर | २४८ | ५९ |
| ११ | पुसद, यवतमाळ | २४८ | ५९ |
| | एकूण | २,७२५ | ६५३ |

# विभागीय आयुक्तनिहाय ११ पंचायतराज प्रशिक्षण केंद्रांचा अनुदान वितरणाचा तपशील

| अ. क्र | पंचायतराज प्रशिक्षण केंद्राचे नांव | डिसेंबर,०९ ते मार्च, २०१० या कालावधीसाठी वितरीत करावयाची रक्कम ( रुपये हजारात ) | | |
|---|---|---|---|---|
| | | वेतन | वेतनेतर | एकूण |
| १ | कोसबाड हिल, ठाणे | २४७ | ५९ | ३०६ |
| | **विभागीय आयुक्त, कोकण** 1214005109 | **२४७** | **५९** | **३०६** |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १ | वर्ये,सातारा | २४७ | ५९ | ३०६ |
| २ | गारगोटी, कोल्हापूर | २४८ | ५९ | ३०७ |
| ३ | गौडगाव, सोलापूर | २४७ | ५९ | ३०६ |
| | **विभागीय आयुक्त, पुणे** 2201000274 | **७४२** | **१७७** | **९१९** |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १ | खिरोदा, जळगांव | २४८ | ६० | ३०८ |
| | **विभागीय आयुक्त, नाशिक** 5101000274 | **२४८** | **६०** | **३०८** |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १ | मुरुड, लातूर | २४८ | ६० | ३०८ |
| | **विभागीय आयुक्त, औरंगाबाद** 3101000274 | **२४८** | **६०** | **३०८** |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १ | खामगांव, बुलढाणा | २४८ | ६० | ३०८ |
| २ | शिवाजीनगर, अमरावती | २४८ | ५९ | ३०७ |
| ३ | पुसद, यवतमाळ | २४८ | ५९ | ३०७ |
| | **विभागीय आयुक्त, अमरावती** 6101000274 | **७४४** | **१७८** | **९२२** |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १ | हनुमाननगर, नागपूर | २४८ | ६० | ३०८ |
| २ | मूल,चंद्रपूर | २४८ | ५९ | ३०७ |
| | **विभागीय आयुक्त, नागपूर** 4601000274 | **४९६** | **११९** | **६१५** |